**दिनांक २३ ते २७ मार्च, २०१७ या कालावधीत थिरुवनंतपुरम, केरळ येथे आयोजित अखिल भारतीय नागरी सेवा फुटबॉल स्पर्धा (२०१६-१७) मध्ये महाराष्ट्राचा संघ सहभागी होण्यासाठी झालेल्या खर्चास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- अभानासे- ३८१७ /प्र.क्र.३८/क्रीयुसे-२,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ३० ऑगस्ट, २०१८

वाचा :- (१) केंद्रीय नागरी सेवा, सांस्कृतिक कार्य आणि क्रीडा मंडळ क्रमांक- ५९/२/२०१६-१७/ सीसीएससीएसबी यांचे दिनांक ०७.०३.२०१७ चे पत्र.
(२) सचिवालय जिमखान्याचे पत्र क्र.-अभानासे/ फुटबॉल /२०१६-१७, दि.१७.०३.२०१७
(३) उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, मुंबई विभाग, मुंबई यांचे पत्र क्रमांक-उपसंक्री / अभानासे/१८-१९/का-४/१५२९, दि.२७.०७.२०१८.

**: शासन निर्णय:**

**दिनांक २३ ते २७ मार्च, २०१७ या कालावधीत थिरुवनंतपुरम, केरळ** येथे पार पडलेल्या **अखिल भारतीय नागरी सेवा फुटबॉल स्पर्धा २०१६-१७** मध्ये भाग घेण्यासाठी महाराष्ट्र शासनाचा संघ निवडण्याकरिता ओव्हल मैदान, चर्चगेट, मुंबई येथे दि.११ व १२ मार्च, २०१७ रोजी निवड चाचणी आयोजित करण्यात आली होती. या चाचणीमध्ये सहभागी झालेल्या २७ अधिकारी व कर्मचा-यांची यादी सोबतच्या विवरणपत्र "क" प्रमाणे तर निवड चाचणीद्वारे निवडण्यात आलेला राज्याचा संघ विवरणपत्र "अ" प्रमाणे आहे. सदर स्पर्धेची निवड चाचणी, प्रशिक्षण शिबीर तसेच राज्य संघाच्या सदर स्पर्धेतील सहभागासाठी विवरणपत्र "ब" प्रमाणे **रु.२७,९००/-(रुपये सत्तावीस हजार नऊशे फक्त)** इतक्या खर्चास कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.

२. उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना सदर रक्कम आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. संघातील ज्या खेळाडूंना किट बॅग्ज व ट्रॅकसूट मिळालेले आहेत ते खेळाडू कोणत्याही अखिल भारतीय नागरी सेवा क्रीडा स्पर्धेसाठी किटबॅग व ट्रॅकसूट दोन वर्षातून एकदा मिळण्यास पात्र ठरतील. या नियमाचे सचिवालय जिमखान्याने काटेकोरपणे पालन केले असेल, या अटीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

४. दिनांक २३.०३.२०१७ ते २७.०३.२०१७ या कालावधीतील अखिल भारतीय नागरी सेवा ॲथलेटिक्स स्पर्धेत सहभागी झालेल्या खेळाडू, प्रशिक्षक व व्यवस्थापक यांना संबंधित विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख यांनी दिनांक २१.०३.२०१७ (म.नं.) पासून कार्यमुक्त करण्यास कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.

५. संघातील खेळाडू, प्रशिक्षक व व्यवस्थापक यांची प्रशिक्षण शिबीर व स्पर्धा काळातील कार्यालयीन अनुपस्थिती ही शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-एलव्हीई-१४८५/प्र.क्र.८३३/ अ/सेवा-९, दिनांक ११ मे, १९८९ व क्रमांक-एलव्हीई/१४९२/४६/सेवा-९, दिनांक ३० जुलै, १९९२

अन्वये "कर्तव्य कालावधी" म्हणून समजण्यात यावा. तसेच स्पर्धा संपल्यानंतर दोन दिवसानंतर खेळाडूंनी मुख्यालयास परत आले असल्याच्या अटीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे. या सर्व संबंधीत खेळाडू यांचा प्रवास भत्ता, दैनिक भत्ता व इतर भत्ते यावर होणारा खर्च संबंधित विभागाच्या / कार्यालय प्रमुखांच्या मुख्य लेखाशिर्षाखाली असणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. स्पर्धेच्या निवड चाचणीसाठी उपस्थित अधिकारी / कर्मचारी (विवरणपत्र-क) यांची कार्यालयीन अनुपस्थिती शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-एलव्हीई/१४९२/४६/सेवा-९, दिनांक ३० जुलै,१९९२ अन्वये कर्तव्यार्थ म्हणून समजण्यात यावी व मुंबई बाहेरील खेळाडूंना अनुज्ञेय असलेला प्रवास / दैनिक भत्ता व इतर सवलती या वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक- एलव्हीई-१४८५/प्र.क्र.८३३/अ/सेवा-९, दिनांक ११ मे, १९८९ व वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक-एलव्हीई-१४०४/प्र.क्र.८/अ/सेवा-८, दिनांक २७ फेब्रुवारी, २००४ च्या आधारे विशेष बाब म्हणून मंजूर करण्यात यावी.

या सवलतीचा लाभ मिळण्यासाठी निवड चाचणीसाठी उपस्थिती असणा-या अधिकारी व कर्मचारी यांच्या उपस्थितीबाबत मानद सचिव, सचिवालय जिमखाना यांनी दिलेले प्रमाणपत्र संबंधित कर्मचा-यांनी त्यांच्या आस्थापना कार्यासनाला सादर करणे आवश्यक राहिल.

७. सचिवालय जिमखान्याने प्रत्यक्ष खर्चाचे विवरणपत्र कोणत्याही परिस्थितीत आदेशाच्या दिनांकापासून १५ दिवसाच्या आत आयुक्त, क्रीडा व युवकसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे तसेच उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना स्पर्धेत केलेल्या खर्चाच्या अहवालासोबत सादर करावे. तसेच जर रक्कम शिल्लक राहिली तर ती उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना त्वरीत परत करण्यात यावी.

८. यासाठी होणारा खर्च सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी “२२०४ क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (०६) अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धा, (०६)(०२) अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धेत सहभाग (२२०४ १९८१), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित तरतूदीतून भागविण्यात यावा.

९. वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग एक, अ.क्र. ५, नियम क्र. ३९(ब) (२) नुसार प्रशासकीय विभागाला दिलेल्या अधिकारा अन्वये सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सचिवालय जिमखाना यांच्याकडून स्पर्धेचा अहवाल, बाबनिहाय प्रत्यक्ष झालेल्या खर्चाचा तपशील, विनियोग प्रमाणपत्र, परिक्षित लेखा विवरणपत्र व मंजूरी आदेशातील सर्व अटींची पूर्तता करण्याच्या अटीवर विवरणपत्र "ब" प्रमाणे खर्चास मंजूरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८३११३१७५७५८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.08.31 13:28:03 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, क्रीडा व युवकसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२. उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, पुणे विभाग, पुणे
३. उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, मुंबई विभाग, मुंबई,
४. जिल्हा क्रीडा अधिकारी, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-४०० ०२१.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
८. वित्त विभाग (व्यय-११), मंत्रालय, मुंबई.
९. मानद महासचिव, सचिवालय जिमखाना, मुंबई-४०० ०३२ (५ प्रती)
१०.संबंधित अधिकारी व कर्मचारी यांचे कार्यालये (सचिवालय जिमखान्यामार्फत)
११.निवड नस्ती (क्रीयुसे-२).

## विवरणपत्र "अ"

दिनांक २३ ते २७ मार्च, २०१७ या कालावधीत थिरुवनंतपुरम, केरळ येथे आयोजित केलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा फुटबॉल स्पर्धा २०१६-१७ मध्ये महाराष्ट्र शासनाच्या फुटबॉल संघाचे प्रतिनिधीत्व करणाऱ्या स्पर्धकांची नावे दर्शविणारे विवरणपत्र.

| क्र. | खेळाडूचे नाव व पदनाम | किटबॅग | ट्रॅकसूट | विभाग / कार्यालय |
|---|---|---|---|---|
| १ | दिलीप मोहन सोलंकी, सफाईगार | नाही | नाही | सार्वजनिक बांधकाम विभाग, प्रशा-४, मंत्रालय, मुंबई. |
| २ | प्रविण राजेंद्र वाघेला, सफाईगार | नाही | नाही | जे.जे. रुग्णालय, भायखळा, मुंबई. |
| ३ | विनोद कांती सोलंकी, सफाईगार | नाही | नाही | जे.जे. रुग्णालय, भायखळा, मुंबई. |
| ४ | जयेश ध. सुसविरकर, शिपाई | नाही | नाही | आयुक्त कार्यालय, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई. |
| ५ | बिपीन अमृत सोलंकी, सफाईगार | नाही | नाही | जे.जे. रुग्णालय, भायखळा, मुंबई. |
| ६ | अमित मोहन अवसरे, स्था.स.अ. | नाही | नाही | अधिक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर ताराबाई पार्क, कोल्हापूर. |
| ७ | अतुल नटवर पटेल, सफाईगार | नाही | नाही | कामा व आल्ब्लेस रुग्णालय, मुंबई -१. |
| ८ | अरविंद ज. नागा, शिपाई | नाही | नाही | अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ९ | सुशांत सु. शिंदे, कनिष्ठ लेखापाल | नाही | नाही | अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई. |
| १० | प्रताप विजय वाघेला, सफाईगार | नाही | नाही | जे.जे. रुग्णालय, भायखळा, मुंबई. |
| ११ | परेश नरेश सोलंकी, सफाईगार | नाही | नाही | जे.जे. रुग्णालय, भायखळा, मुंबई. |
| १२ | गणेश मोहन जाधव, लिपिक | नाही | नाही | जिल्हा अधिकारी कार्यालय, कोल्हापूर. |
| १३ | छगन मणिलाल चौहाण, सफाईगार | नाही | नाही | जे.जे. रुग्णालय, भायखळा, मुंबई. |
| १४ | विश्वनाथ सुंदर शेट्टी, स्वयंपाकी | नाही | नाही | गो.ते. रुग्णालय, मुंबई. |
| १५ | गौस सैफुद्दीन मकानदार, लिपिक | नाही | नाही | तहसिलदार कार्यालय, आजरा. |
| १६ | महेश नरशी सोलंकी, सफाईगार | नाही | नाही | जे.जे. रुग्णालय, भायखळा, मुंबई. |
| १७ | भरत चिनकाटे, मुख्य लिपिक | नाही | नाही | १, महाराष्ट्र बटा, एन.सी.सी. जुने सचिवालय आवार, मुंबई - ३२. |
| १८ | प्रशांत बाबुराव पाटील, वरिष्ठ लिपिक | नाही | नाही | जिल्हा न्यायालय, कोल्हापूर, कसबा बावडा, कोल्हापूर. |
| १९ | आशिष पाटील, शिपाई | नाही | नाही | कृषि अधिकारी, कृषि चिकित्सालय, जयसिंगपूर कार्यालय, कोल्हापूर. |
| २० | अमित डोळस, लिपिक व्यवस्थापक | नाही | नाही | सह संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग, कोकण भवन, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई. |
| २१ | दिपक पा. चिमणकारे, प्रशिक्षक | नाही | नाही | विदर्भ ज.वि. व उपसा सिंचन विभाग, भंडारा, नागपूर. |

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.08.31 13:29:01 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

## विवरणपत्र "ब"

दिनांक २३ ते २७ मार्च, २०१७ या कालावधीत थिरुवनंतपुरम, केरळ येथे आयोजित केलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा फुटबॉल स्पर्धा २०१६-१७ मध्ये महाराष्ट्र शासनाच्या फुटबॉल संघासाठी झालेल्या खर्चाचे विवरणपत्र.

| क्र. | तपशील | प्रत्यक्षांत झालेला खर्च |
|---|---|---|
| १) | **पूर्व चाचणी :** | |
| | निवड चाचणीसाठी लागलेली लेखन सामुग्री, स्टेन्सील, स्टेन्सील पेपर्स, पोष्टाचे स्टॅम्प, लिफाफे तसेच मैदानाची व्यवस्था पहाणे इत्यादि झालेला खर्च. | ५०० |
| २) | **निवड चाचणी :** | |
| १ | निवड चाचणीस उपस्थित राहिलेल्या असोसिएशनच्या प्रतिनिधीस मानधन | ६०० |
| २ | निवड चाचणीस उपस्थित राहिलेल्या ३ पंचाचे मानधन (४०० x ३) | १,२०० |
| ३ | फुटबॉल मैदान तयार करण्यासाठी मोबदला | १,५०० |
| ४ | निवड चाचणीस उपस्थित अधिकारी, निमंत्रक, स्वयंसेवक, पंच व प्रतिनिधी यांच्या अल्पोपहार व चहापाणीवरील खर्च. | १,५०० |
| ४) | **क्रीडा साहित्य खरेदीसाठी होणारा खर्च :-** | |
| १ | २ फुटबॉल रु. ८००/- प्रमाणे. | १,६०० |
| २ | २१ गॅलक्सी सेथेटिक शाईनिंग कलॉथ जर्सी (मोनोग्राम व क्रमांकासह) रु.५००/- प्रमाणे. | १०,५०० |
| ३ | २१ गॅलक्सी सेथेटिक शाईनिंग क्लॉथ शॉर्टस रु. ३५०/- प्रमाणे. | ७,३५० |
| ४ | २१ जोडी डिलक्स प्राईम नायलॉन पायमोजे रु.१५०/- प्रमाणे. (स्टॉकींग्ज) | ३,१५० |
| | **एकूण रुपये : सत्तावीस हजार नऊशे फक्त** | **२७,९००** |

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.08.31 13:30:21 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

## विवरणपत्र - क

दिनांक २३ ते २७ मार्च, २०१७ या कालावधीत थिरुवनंतपुरम, केरळ येथे आयोजित केलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा फुटबॉल स्पर्धा २०१६-१७ मध्ये भाग घेणाऱ्या महाराष्ट्र शासनाच्या फुटबॉल संघाची निवड करण्यासाठी दि. ११ व १२ मार्च, २०१७ रोजी निवड चाचणीसाठी उपस्थित राहिलेले अधिकारी कर्मचारी खेळाडूंची नावे विवरणपत्र.

| क्र. | खेळाडूचे नाव | पदनाम | विभाग / कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | गौस सैफुद्दीन मकानदार | लिपिक | तहसिलदार कार्यालय, आजरा. |
| २ | प्रशांत बाबुराव पाटील | व. लिपिक | जिल्हा न्यायालय, कोल्हापूर, कसबा बावडा, कोल्हापूर. |
| ३ | अमित मोहन अवसरे | स्था.अ.स. | अधिक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर ताराबाई पार्क, कोल्हापूर. |
| ४ | अनिल चिमन वाघेला | सफाईगार | जे.जे. रुग्णालय, भायखळा, मुंबई. |
| ५ | बिपीन अमृत सोलंकी | सफाईगार | जे.जे. रुग्णालय, भायखळा, मुंबई. |
| ६ | प्रविण राजेंद्र वाघेला | सफाईगार | जे.जे. रुग्णालय, भायखळा, मुंबई. |
| ७ | महेश नरशी सोलंकी | सफाईगार | जे.जे. रुग्णालय, भायखळा, मुंबई. |
| ८ | अतुल नटवर पटेल | सफाईगार | कामा व आल्ब्लेस रुग्णालय, मुंबई -१. |
| ९ | छगन मणिलाल चौहाण | सफाईगार | जे.जे. रुग्णालय, भायखळा, मुंबई. |
| १० | प्रताप विजय वाघेला | सफाईगार | जे.जे. रुग्णालय, भायखळा, मुंबई. |
| ११ | परेश नरेश सोलंकी | सफाईगार | जे.जे. रुग्णालय, भायखळा, मुंबई. |
| १२ | विश्वनाथ सुंदर शेट्टी | स्वयंपाकी | गो.ते. रुग्णालय, मुंबई. |
| १३ | सुशांत सु. शिंदे | कनिष्ठ लेखापाल | अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई. |
| १४ | जयेश धनंजय सुसविरकर | शिपाई | आयुक्त कार्यालय, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई. |
| १५ | विनोद कांती सोलंकी | सफाईगार | जे.जे. रुग्णालय, भायखळा, मुंबई. |
| १६ | भरत चिनकाटे | मुख्य लिपिक | १, महाराष्ट्र बटा, एन.सी.सी. जुने सचिवालय आवार, मुंबई - ३२. |
| १७ | दिलीप मोहन सोलंकी | सफाईगार | सार्वजनिक बांधकाम विभाग, प्रशा-४, मंत्रालय, मुंबई. |
| १८ | अरविंद ज. नागा | शिपाई | अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई. |
| १९ | गणेश मोहन जाधव | लिपिक | जिल्हा अधिकारी कार्यालय, कोल्हापूर. |
| २० | दिपक पा. चिमणकारे | शाखा अभियंता | विदर्भ ज.वि. व उपसा सिंचन विभाग, भंडारा, नागपूर. |
| २१ | अमित डोळस | टिप्पणी सहाय्यक | सहसंचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग, कोकण भवन सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई. |
| २२ | प्रदिप गावडे | कक्ष अधिकारी | गृह निर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| २३ | सूर्यकांत मेहेर | शिपाई | महिला व बालकल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई |
| २४ | बी.एम. गांगुर्डे | वरीष्ठ लिपिक | व्यवस्थापक, बी.डी.डी. चाळ, वरळी, मुंबई. |
| २५ | शिवाजी धामणकर | अवर सचिव | सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| २६ | शरद फाटक | सांख्यिकी सहाय्यक | अर्थ व सांख्यिकी संचालनालय, बांद्रा कुर्ला संकुल, बांद्रा (पू) मुंबई. |
| २७ | करुण मोरे | अधीक्षक | कामगार सुरक्षा संचालनालय, मुंबई. |

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca28 0267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.08.31 13:32:00 +05'30'

**( राजेंद्र पवार )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**